**अचानक नाहीशा झालेल्या व ठावठिकाणा माहित नसलेल्या शासकीय कर्मचारी / निवृत्तीवेतनधारक यांच्या कुटुंबियांना कुटुंबनिवृत्तीवेतन मंजूर करणेबाबत.. बेपत्ता श्री. आबाजी शामुवेल श्रीसुंदर, पोलीस शिपाई.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः कुनिवे-०२१५/प्र.क्र.४०/आस्था-१**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १७ एप्रिल, २०१५.

वाचा :-१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : सेनिवे-१०३९/४९१/सेवा-४, दि. ५.७.१९९१.

२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/३९/४२ /कुनिवे-संकीर्ण/०१/२०१४, दि. २०.१२.२०१४.

३) समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्र.३, जालना यांचे कार्यालयाचे पत्र क्र.लेशा-प्रलि/कुनिवे/श्रीसुंदर/२०१४/५८७१, दि. २१.०७.२०१४.

प्रस्तावना :

श्री. आबाजी शामुवेल श्रीसुंदर, पोलीस शिपाई हे समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्र.३, जालना यांचे आस्थापनेवर कार्यरत होते. ते दि. ३१.०३.१९९५ रोजी घरातुन निघुन गेले. त्यानंतर ते परत आले नाहीत. श्री. आबाजी शामुवेल श्रीसुंदर, पोलीस शिपाई बेपत्ता झाल्याची खबर सदर बाजार पोलीस स्टेशन जालना येथे दि. ३०.१२.१९९६ रोजी प्रथम खबरी अहवाल दाखल केलेला होता. याची नोंद मिसिंग रजिस्टर नंबर ४०/९६ वर आहे. त्यानुषंगाने सदर बाजार पोलीस स्टेशनने शोध घेतला परंतु श्री. आबाजी शामुवेल श्रीसुंदर मिळून येत नसल्याबाबतचा अहवाल दि. १९.०३.२००८ रोजी दिलेला आहे.

२. श्री. आबाजी शामुवेल श्रीसुंदर यांना अचानक बेपत्ता होऊन सात वर्षे पूर्ण झाली आहेत. त्यांच्या पत्नी श्रीमती लक्ष्मी आबाजी श्रीसुंदर यांना कुटुंब निवृत्तीवेतन मंजूर करण्याची विनंती केली आहे. श्री. आबाजी शामुवेल श्रीसुंदर यांच्या सेवापुस्तकात कोणतेही नामनिर्देशन त्यांनी केले नाही. श्रीमती लक्ष्मी श्रीसुंदर हया पोलीस शिपाई श्री. श्रीसुंदर यांच्या पत्नी असल्याचे दिवाणी न्यायाधीश ( वरिष्ठ स्तर ), जालना यांनी वारसाहक्क प्रमाणपत्र दिलेले आहे. त्यांच्या पत्नी श्रीमती लक्ष्मी आबाजी श्रीसुंदर यांना कुटुंब निवृत्तीवेतन मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्र. ३,

जालना यांना क्षतीपूर्ती बंधपत्र, प्रथम खबरी अहवाल, पोलीस स्टेशनचा अंतिम अहवाल इ. कागपत्रांसह दाखल केला आहे. सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय** :

श्री. आबाजी शामुवेल श्रीसुंदर हे बेपत्ता होऊन ७ वर्षे झाल्याने श्रीमती लक्ष्मी आबाजी श्रीसुंदर यांनी कुटुंब निवृत्तीवेतनाची मागणी केली आहे. श्री. आबाजी शामुवेल श्रीसुंदर यांच्या सेवापुस्तकात कोणतेही नामनिर्देशन त्यांनी केले नसल्याने श्रीमती लक्ष्मी आबाजी श्रीसुंदर हया पोलीस शिपाई श्री. श्रीसुंदर यांच्या पत्नी असल्याचे दिवाणी न्यायाधीश ( वरिष्ठ स्तर ), जालना यांनी वारसाहक्क प्रमाणपत्र सादर केले असल्याने बेपत्ता आबाजी शामुवेल श्रीसुंदर, पोलीस शिपाई यांच्या पत्नी श्रीमती लक्ष्मी आबाजी श्रीसुंदर यांना कुटुंब निवृत्तीवेतन प्रदान करण्यास शासन मंजूरी देत आहे. तथापि, वित्त विभाग, क्रमांक सेनिवे-१०८९/४९१/सेवा-४, दि. ५.७.१९९१ अन्वये क्षतिपूर्ती बंधपत्र परिपूर्ण करुन व आवश्यक बाबींची पूर्तता करुन घेण्याची खबरदारी समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्र. ३, जालना यांनी घ्यावी.

सदर शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक सेनिवे-१०८९/४९१/सेवा-४, दि. ५.७.१९९१, वित्त विभाग, क्रमांक सेनिवे-१०८९/४९१/सेवा-४, दि. ७.१०.१९९३, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक सेनिवे-१०९४/१५६/सेवा-४, दि. २६.०६.१९९५, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक सेनिवे-१०००/प्र.क्र. ८३/सेवा-४, दि. ३.०७.२००० ला अनुसरुन उक्त शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४१७१७१५३००१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Yuvraj Bayaji Ajetrao

Digitally signed by Yuvraj Bayaji Ajetrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Yuvraj Bayaji Ajetrao
Date: 2015.04.17 17:27:53 +05'30'

**( युवराज अजेटराव )**

अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्र. ३, जालना.

३. बेपत्ता श्री आबाजी शामुवेल श्रीसुंदर यांचे पत्नीस समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्र.३, जालना यांचे कार्यालयामार्फत.

४. महालेखापाल ( लेखा व हकदारी), महाराष्ट्र,१/२, मुंबई/नागपूर.

५. अधिदान व लेखा अधिकारी, जालना.

६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, जालना.

७. निवड नस्ती ( आस्था-१ ).